शासकीय कर्मचा-यांच्या संघटनांना
[औद्योगिकेतर] शासन मान्यता
देण्यासंबंधीची प्रकरणे निकाली
काढण्याबाबत ---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक:आरजीए-१०८६/सीआर-७२/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:३ ऑक्टोबर, १९८६.

परिपत्रक

महाराष्ट्र नागरी सेवा [वर्तणूक] नियम, १९७९ मधील नियम २९ च्या तरतुदीनुसार शासन, शासकीय कर्मचा-यांच्या संघटनांना [औद्योगिकेतर] शासन मान्यता देते. गेल्या जून-ऑगस्ट १९८६ च्या अधिवेशनात या बाबतच्या प्रलंबित अर्जाविषयी कपात सूचना आलेली होती. तेव्हा मंत्रालयीन विभागांना अशी विनंती करण्यात येते की त्यांच्याकडे प्रलंबित असलेल्या शासकीय कर्मचा-यांच्या संघटनांना [औद्योगिकेतर] शासन मान्यता देण्यासंबंधीची प्रकरणे त्वरीत निकाली काढण्याच्या दृष्टीने कृपया योग्य ती कार्यवाही करावी.

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व मंत्रालयीन विभाग.